**आकस्मिक खर्चाच्या संक्षिप्त देयकावर काढण्यात आलेल्या रकमांची तपशिलवार देयके विहीत मुदतीत सादर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन परिपत्रक क्र. : विनिप-०९/ प्र.क्र. (३०/२०१६)/पीएसी-१**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक:- २४ जानेवारी, २०२२

**संदर्भ :-**

१) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. मआख-१०.०२/प्र.क्र.८८/२००२/विनियम, दिनांक १०.०४.२००३
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. मखाअ-१००३/प्र.क्र. ३१/०३/विनियम, दिनांक २८.६.२००५.
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. मआख-१०.०६/प्र.क्र. ४२/२००६/विनियम, दिनांक १२.२.२००८.
४) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. मआख-१०.०६/प्र.क्र. ४२/२००६/विनियम, दिनांक ११.३.२००८.
५) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. संक्षिप्त-२०१२/प्र.क्र. ०८/२०१२/विनियम, दिनांक १४.३.२०१३.
६) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. मआख-२०१४/प्र.क्र.४२/विनियम, दिनांक ९.१०.२०१४.
७) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. मुंविनि-२०१७/प्र.क्र.३८/२०१७/विनियम, दिनांक १८.१२.२०१७.

महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम १९६५ मधिल परिशिष्ट - एक चे विवरणपत्र -२ आणि संदर्भ क्रमांक २ च्या शासन निर्णयान्वये अंतर्भुत केलेले विवरणपत्र एक व सदर शासन निर्णयामध्ये दर्शविलेल्या अन्य बाबीसाठी जेव्हा तातडीची पैशांची आवश्यकता असेल त्यावेळेस आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना वित्तीय अधिकाराच्या मर्यादेत संक्षिप्त देयकांवर रकमा काढता येतात. संक्षिप्त देयकांचे तपशिलवार देयक, सदरच्या संक्षिप्त देयकांची रक्कम आहरित केल्यापासून १ महिन्याच्या आत कोषागार कार्यालयाच्या मार्फत महालेखापाल मुंबई / नागपूर यांना तर मुंबई शहर व मुंबई उपनगर जिल्हातील कार्यालयांनी थेट अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई यांना सादर करणे बंधनकारक असून त्यांचेकडुन निपटारा प्रमाणपत्र प्राप्त करून घेणे आवश्यक असते. सदर बाबत वित्त विभागाने वेळोवेळी संदर्भीय शासन निर्णय / परिपत्रकान्वये सुचना निर्गमित केलेल्या आहेत. परंतु विहीत मुदतीत तपशिलवार देयके अधिनस्त कार्यालयाकडुन महालेखापाल कार्यालय, मुंबई / नागपूर / अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई यांना सादर केली जात नाहीत व परिणामी प्रलंबित संक्षिप्त देयकांची संख्या वाढत जाते.

भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांच्याकडुन दरवर्षी विधानमंडळास सादर केल्या जाणाऱ्या राज्य वित्त व्यवस्थेवरील अहवालात "**संक्षिप्त आकस्मिक देयकांसंदर्भातील तपशिलवार देयके सादर करण्यातील प्रलंबितता**" या शिर्षाखाली परिच्छेद घेतला जातो व त्यात प्रत्येक विभागाकडे प्रलंबित असलेल्या संक्षिप्त देयकांची संख्या व त्यात गुंतलेली रक्कम दर्शविली जाते. सदर बाबत लोकलेखा समितीसमोर विभागीय सचिवांची

साक्ष होत असते. त्यामुळे महसूल व वन विभागातील प्रलंबित तपशिवार देयक संख्या कमी करण्याच्या दृष्टीने विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व आहरण व संवितरण अधिकारी / नियंत्रक अधिकारी यांना सुचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :-**

१. सर्व आहरण व संवितरण अधिकारी यांनी प्रलंबित संक्षिप्त देयकांची माहिती महालेखापाल मुंबई / नागपूर यांच्या संकेतस्थळावरून Online Reconciliation Module मध्ये प्रधान लेखाशिर्षनिहाय, जिल्हानिहाय, आहरण व संवितरण अधिकारी निहाय प्रलंबित संक्षिप्त देयकांची यादी उपलब्ध असते, तर मुंबई शहर व उपनगरामधील कार्यालयांनी अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई यांचेकडुन प्रलंबित संक्षिप्त देयकांची माहिती प्राप्त करून घ्यावी. सदर उपलब्ध असलेल्या माहितीच्या आधारे सर्व आहरण व संवितरण अधिकारी यांनी आपल्या कार्यालयाची प्रलंबित संक्षिप्त देयकांचे तपशिलवार देयके तयार करून तात्काळ संबधित उपकोषागार अधिकारी / कोषागार अधिकारी / अधिदान व लेखाधिकारी कार्यालयास सादर करावे.

२. सदर देयक सादर केल्यानंतर कोषागार/अधिदान व लेखा कार्यालय व महालेखापाल कार्यालयांकडे संबधितांनी स्वत: पाठपुरावा करून सदर देयकांचे निपटारा प्रमाणपत्र प्राप्त करून घ्यावे.

३. तसेच जे अधिकारी प्रलंबित संक्षिप्त देयकांची तपशिलवार देयके सादर करणार नाहीत अशा आहरण व संवितरण अधिकाऱ्याविरुध्द शिस्तभंगविषयक कार्यवाही करण्याचे निर्देश संदर्भिय शासन परिपत्रक दिनांक ९.१०.२०१४ अन्वये दिलेले आहेत.

४. प्रलंबित असलेल्या सर्व संक्षिप्त देयकांची तपशिवार देयके जर सादर केली गेली नाहीत, तर त्या विभागाची / कार्यालयाची संबधित लेखाशिर्षाखाली प्राप्त होणारी संक्षिप्त देयके / सहाय्यक अनुदान देयके कोषागार / अधिदान व लेखाधिकारी कार्यालयाकडुन पारीत केली जाणार नाहीत अशा सुचना संदर्भ क्र. ७ च्या दि.१८/१२/२०१७ रोजीच्या परिपत्रकान्वये दिलेल्या आहेत.

५. संक्षिप्त देयके व तपशिलवार देयकांबाबत संदर्भिय शासन निर्णय / परिपत्रकातील सुचना सर्व आहरण व संवितरण अधिकारी यांच्या पुन्हा निर्दशनास आणुन देण्यात येत आहेत.

६. सर्व विभागीय आयुक्त, नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे व जमाबंदी आयुक्त, संचालक आणि भुमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे व प्रधान मुख्य वनसंरक्षक, नागपूर यांनी त्यांच्या अधिनस्त

कार्यालयातील प्रलंबित तपशिलवार देयके तात्काळ सादर करण्याबाबत व्यक्तीशः लक्ष घालुन भविष्य काळात तपशिलवार देयके विहीत मुदतीत महालेखापाल कार्यालयास सादर करण्याची दक्षता घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०२२०१२४१७४३१८३३१९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AJIT SOPANRAO DESHMUKH

Digitally signed by AJIT SOPANRAO DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c7f9815c89488c717b56e1ae0b06802c87d325011b06b9fb279823a37e0511b2, pseudonym=06DBBC5D80F944565DD5BDEF080730B6FF4B904B, serialNumber=704CB545C50221B15CDE7CCB8854E694C765DFB3A0240E891EBFB56EE79E3440, cn=AJIT SOPANRAO DESHMUKH
Date: 2022.01.24 17:47:57 +05'30'

**(अ. सो. देशमूख)**
**उप सचिव**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. अप्पर मुख्य सचिव (महसूल) / प्रधान सचिव (मदत व पुर्नवसन)/प्रधान सचिव (वने) यांचे स्वीय सहायक,
२. महसूल व वन , मदत व पुर्नवसन विभागातील सर्व संबंधित उप सचिव / सहसचिव

**प्रत :-**

१. विभागीय आयुक्त, कोकण / नाशिक / पुणे / औरंगाबाद / अमरावती / नागपूर
२. जमाबंदी आयुक्त, व संचालक, भुमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे.
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
५. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण,महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. महालेखापाल (लेखापरीक्षा) १ व २, महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
७. जिल्हाधिकारी (सर्व).
८. उप सचिव, वित्त विभाग (लोलेस), मंत्रालय, मुंबई
९. निवडनस्ती पी ए सी - १.